**महाराष्ट्र शासन**

क्र.सकआ-२०१०/प्र.क्र. २७२ /आस्था-२
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - २२/१०/२०१०

संदर्भ - (१) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र. ९६६(२१)/५११०/पंधरा, दि. ७ एप्रिल, २०१०
(२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र. ९६६(२१)/५११०/पंधरा, दि. १ जून, २०१०
(३) शासन आदेश, समक्रमांक, दि. २९/७/२०१०
(४) शासन आदेश, समक्रमांक, दि. १२/८/२०१०
(५) शासन आदेश, समक्रमांक, दि. २६/८/२०१०
(६) शासन आदेश, समक्रमांक दि. ०९/०९/२०१०

## आदेश

या विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील संचालक, समाजकल्याण, पुणे यांच्या आस्थापनेवरील विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी व तत्सम गट-अ संवर्गातील (वेतन बँड रु.९३००-३४८००, ग्रेड पे रु.४६००) रिक्त पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती देण्याकरीता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन पत्रांव्दारे एकूण ३२ (बत्तीस) उमेदवारांची शिफारस केली आहे. त्यापैकी ज्या उमेदवारांची शैक्षणिक अर्हता / वैद्यकीय / चारित्र्य / जाती प्रमाणपत्र पडताळणी पुर्ण झाली आहे अशा ३० उमेदवारांना संदर्भाधिन शासन आदेशान्वये नियुक्ती देण्यात आली आहे. त्यानंतर आता ज्या उमेदवारांची शैक्षणिक अर्हता / वैद्यकीय / चारित्र्य / जाती प्रमाणपत्र पडताळणी पुर्ण झाली आहे अशा पुढील एका उमेदवाराला विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी व तत्सम गट-अ या संवर्गात परिविक्षाधीन अधिकारी म्हणून त्यांच्या नावासमोर दर्शविल्याप्रमाणे नियुक्तीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव व पत्ता | प्रवर्ग | गुणवत्ता क्रमांक | पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. मारोतराव गणपत वाठ,<br>श्रध्दा नगर, व्हाईट हाऊस कॉलनी, पुसद, जि. यवतमाळ, ४४५२०४ | इमाव<br>अपंग<br>(कर्णबधिर) | ३२ | समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, बीड |

२. उपरोक्त परिच्छेद क्र. १ मधील परिविक्षाधीन अधिकाऱ्याला पुढे नमूद केलेल्या अटींच्या अधिन राहून ही नियुक्ती देण्यात येत आहे.

(१) उपरोक्त परिविक्षाधीन अधिकाऱ्याची ही नियुक्ती, ते ज्या दिनांकास सदर पदावर रुजु होतील त्या दिनांकापासून, दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी राहील. या परिविक्षा कालावधी मध्ये त्यांना शासन अधिसूचना, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग, क्र. बीसीई १९६९/३६००/का -४, दि.२४/९/१९७५ अन्वये विहित करण्यात आलेली विभागीय परीक्षा उत्तीर्ण करावी लागेल. विहित मुदतीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास या अधिनियमातील तरतुदीनुसार त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील. याशिवाय शासनाने विहित केलेल्या हिंदी / मराठी या भाषा परीक्षा सुध्दा विहित मुदतीत उत्तीर्ण कराव्या लागतील. परिविक्षा कालावधीचे एक वर्ष पुर्ण झाल्यानंतर त्यांची वेतनवाढ काढण्यास अनुमती देण्यात येईल. त्यानंतरची वेतन वाढ मात्र त्यांनी परिविक्षा कालावधीत समाधानकारकरित्या पुर्ण केल्यानंतरच अनुज्ञेय होईल.

(२) या परिविक्षाधीन अधिकाऱ्याला देण्यात येणाऱ्या प्रशिक्षणाचा कालावधी हा परिविक्षा कालावधीमध्ये अंतर्भूत राहील.

(३) परिविक्षा कालावधीत या परिविक्षाधीन अधिकाऱ्याने कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास, त्यांचे काम किंवा वर्तणुक अयोग्य अथवा अननुरुप आढळल्यास ते सेवेतून कमी करण्यास पात्र ठरतील.

*कृ.मा.प.....*

(४) उपरोक्त परिविक्षाधीन अधिकाऱ्याने हे आदेश मिळाल्यापासून एक महिन्याच्या कालावधीत शासन सेवेत त्यांना नियुक्ती देण्यात आलेल्या पदावर रुजू व्हावे. त्याकरीता त्यांनी संचालक, समाजकल्याण, पुणे यांचेशी त्वरित संपर्क साधावा. जे परिविक्षाधीन अधिकारी या मुदतीत रुजू होणार नाहीत, ते महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने गुणवत्तेनुसार दिलेली त्यांची ज्येष्ठता गमावण्यास पात्र ठरतील. तसेच त्यांच्या नियुक्तीचे हे आदेश कोणतीही पूर्व सूचना न देता रद्द करण्यात येतील.

(५) असेही नमूद करण्यात येते की, एकूण सर्व ३२ उमेदवार नियुक्ती स्विकारण्यासाठी हजर झाले आहेत. त्यापैकी ज्या ३० उमेदवारांची पडताळणी पुर्ण झाली आहे त्या उमेदवारांना संदर्भाधीन शासन आदेशांन्वये नियुक्ती देण्यात आलेली आहे. या व्यतिरिक्त एका उमेदवाराला या आदेशाअन्वये नियुक्ती देण्यात येत आहे. इतर उमेदवारांची पडताळणी झालेली नाही. या कारणास्तव त्यांना पदस्थापना देता आलेली नाही. मात्र त्यामुळे आता ज्या उमेदवाराला नियुक्ती देण्यात येत आहे व पुर्वी ज्या ३० उमेदवारांना नियुक्ती देण्यात आली आहे ते त्या इतर उमेदवारांपेक्षा जेष्ठ ठरणार नाहीत. तर त्यांचे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिलेले गुणवत्ताक्रम कायम राहतील व त्या प्रमाणेच त्यांची आपापसातील सेवा ज्येष्ठता कायम राहील, याची नोंद घेण्यात यावी.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्रमांक २०१०१०२२२०२२३०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( कि.पां. वडते)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
श्री. मारोतराव गणपत वाठ, श्रध्दा नगर, व्हाईट हाऊस कॉलनी, पुसद, जि. यवतमाळ, ४४५२०४
प्रत,
संचालक , समाजकल्याण, पुणे.
आयुक्त, अपंगकल्याण, पुणे
उपसचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
सर्व उपसचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, पुणे
प्रधान सचिव (सामाजिक न्याय) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., अकोला.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी,अकोला.
मा. मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी.
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी.
सर्व समाजकल्याण अधिकारी, गट-अ, जि.प.
निवड नस्ती ( आस्था-२ )